**तालुक्याच्या ठिकाणी ज्या महसूली गावाच्या तलाठ्यांची कार्यालये आहेत अशा गावांचे हस्तलिखित सातबाराचे वितरण बंद करण्यात येऊन अशा गावांमध्ये संगणकीकृत सातबाराचा वापर अनिवार्य करण्यासंबंधी.**

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्र.सीएलआर-१००८/प्र.क्र.२/ल-१ सेल**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.**
**दिनांक:- २७ मे, २००९.**

**प्रस्तावना :-** भूमि अभिलेखांचे संगणकीकरण करणे या १०० टक्के केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत राज्यातील सर्व सुमारे २११ लक्ष सातबाराची डाटा एन्ट्री, व्हेरिफिकेशन व व्हॅलीडेशनचे काम पूर्ण झालेले असून, संगणीकृत गाव नमुना नं.सातबाराची विक्री / वितरण करण्यात येत आहे. संगणक सामुग्रीचा वापर करून सर्व ३५८ तालुक्याचे ठिकाणाहून संगणीकृत सातबाराचे वितरण होत असल्यामुळे, जनतेत संगणीकृत सातबारा लोकप्रिय झालेला आहे. तसेच, केंद्र शासनाच्या ग्रामीण विकास मंत्रालयाच्या सन २००८-०९ करिता मागण्यांच्या संदर्भातील स्थायी समितीच्या ३६व्या अहवालातील शिफारसी/निरिक्षणांमध्ये अ.क्र.३.७४ येथे पुढीलप्रमाणे शिफारस केली आहे **"Besides where the RoR data work has been computerised, there is an urgent need to stop the manual issue of RoR. The department should take the desired steps in this regard** ( ज्या जागी सातबाराची डाटा एन्ट्री, व्हेरिफिकेशन व व्हॅलीडेशनचे काम पूर्ण झालेले आहे व सातबारा संगणीकृत करण्यात आलेला आहे, त्या ठिकाणी हस्तलिखित सातबाराचे वितरण तातडीने बंद करण्याची आवश्यकता आहे. विभागाने यासंदर्भात आवश्यक पावले उचलावीत)**".** केंद्र शासनाने दिलेल्या सदर मार्गदर्शक सूचनांची अंमलबजावणी करणे आवश्यक असल्यामुळे आणि सर्व तालुक्याच्या ठिकाणी संगणक सामग्री तसेच ६ तास बॅकअप देणारे युपीएस उपलब्ध असल्यामुळे, अंमलबजावणीचा पहिला टप्पा म्हणून तालुक्याच्या ठिकाणी ज्या महसूली गावाच्या तलाठ्यांची कार्यालये आहेत अशा गावांचे हस्तलिखित सातबाराचे वितरण बंद करण्यात येऊन अशा गावांमध्ये संगणकीकृत सातबाराचा वापर अनिवार्य करणे उचित / योग्य आहे.

**शासन निर्णय**

**तालुक्याच्या ठिकाणी ज्या महसूली गावाच्या तलाठ्यांची कार्यालये आहेत अशा गावांचे हस्तलिखित सातबाराचे वितरण बंद करण्यात येऊन अशा गावांमध्ये संगणकीकृत सातबाराचा वापर अनिवार्य करण्यात येत आहे.** सदर आदेश तात्काळ अंमलात येतील.

उपरोक्त शासन निर्णय शासनाच्या बेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेतांक २००९०५२८१४३४४९००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( ज. का. घरत )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति:-** १) जमाबंदी आयुक्त आणि संचालक, भूमि अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.

२) सर्व विभागीय आयुक्त. महाराष्ट्र राज्य.
३) सर्व जिल्हाधिकारी. महाराष्ट्र राज्य.
४) सर्व तहसिलदार/मंडलाधिकारी/तलाठी, महाराष्ट्र राज्य.
५) ल-१ सेल कार्यासन,महसूल व वन विभाग (निवडनस्ती), मंत्रालय, मुंबई.